राज्यात बनावट संगणकीकृत मिळकत पत्रिका तयार होऊ नये यासाठी प्रतिबंधक उपाययोजना करण्याकरीता जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने शिफारस केलेल्या उपाययोजना स्विकृत करण्यात येवून त्याची अंमलबजावणी करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः समिती-२०१८/प्र.क्र.७२/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ११ जून, २०२०

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक समिती-२०१८/प्र.क्र.७२/ल-१, दि. २७.०२.२०२०
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. ३१६५८/ना.भू.२/का.वि.५४३/बनावट मिळकत पत्रिका अकोला/२०१९, दि. ०८.११.२०१९ चे पत्र व त्यासोबतचा समितीचा अहवाल

**प्रस्तावना :-**

सन-२०१७ च्या विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशनात "अकोला शहरातील भूखंड तालुका भूमि अभिलख कार्यालयातील अधिकारी आणि कर्मचाऱ्यांनी बळकाविल्याबाबत" या विषयावर विधानसभा तारांकित प्रश्न क्र.९५३७२ उपस्थित केला होता. त्यानुषंगाने जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी सादर केलेल्या अहवालात मूळ मिळकत पत्रिका अभिलेखात नसतांना संगणकावरती बनावटरित्या तयार करण्यात आलेल्या निदर्शनास आल्याने, तत्कालीन मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक १५.१२.२०१७ रोजी सदर विधानसभा तारांकित प्रश्नाच्या उत्तराच्यावेळी सभागृहात "आपणा सर्वांना चिंतेत टाकणारी व विचार करण्यास भाग पाडणारी उक्त प्रकरणातील घटना असून त्याचा गांभीर्यपूर्वक विचार शासनाने सुरु केला आहे. या प्रकरणी आवश्यकता भासली तर हे प्रकरण कसे घडले याचा शोध घेण्याकरीता एनआयसीची मदत घेण्यात येईल. राज्याचे जमाबंदी आयुक्त श्री. एस. चोक्कलिंगम, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमून या प्रकरणाचा छडा लावण्यात येईल. सदरहू प्रकरण अतिशय गंभीर आहे. या प्रकारची पुनरावृत्ती भविष्यात होऊ नये, त्यास प्रतिबंध करण्याकरिता उपाययोजना करण्यासंदर्भात श्री. चोकलिंगम यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येईल." असे आश्वासन दिले होते. त्यानुषंगाने शासनाने वाचा क्रमांक १ अन्वये जमाबंदी आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली बनावट संगणकीकृत मिळकत पत्रिका तयार होऊ नये यासाठी प्रतिबंधक उपाययोजना करण्याकरिता समिती गठित करण्यात आली होती. आता वाचा क्रमांक २ अन्वये समितीने त्यांच्या शिफारसीसह अहवाल शासनास सादर केला आहे. सदर अहवालाची छाननी करून मिळकत पत्रिकेचा डाटा अधिक सुरक्षित ठेवणे, डाटाचा गैरवापर टाळता येणे, डाटामध्ये अनधिकृत बदल करणे सहजासहजी शक्य् न होणे आणि केलेले बदल तात्काळ निदर्शनास येतील याबाबीचा विचार करून श्री. एस. चोक्कलिंगम, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या समितीने बनावट संगणकिकृत मिळकत पत्रिका तयार होऊ नये यासाठी प्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबत सूचविण्यात

आलेल्या प्रतिबंधात्मक उपाययोजना स्विकारण्यात येवून त्याची अमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

बनावट संगणकीकृत मिळकत पत्रिका तयार होऊ नये यासाठी प्रतिबंधक उपाययोजना करण्याकरिता श्री. एस. चोक्कलिंगम, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या समितीकडून सूचविण्यात आलेल्या प्रतिबंधात्मक उपाययोजना पैकी खाली नमूद करण्यात आलेल्या प्रतिबंधात्मक उपाययोजना स्विकारण्यात येवून त्याची अमलबजावणी करण्यास शासन या व्दारे मान्यता देत आहे.

**I)संगणक प्रणालीत कर्तव्यनिहाय नियंत्रित प्रवेश:-** भविष्यात संगणकीय प्रणालीमध्ये प्रत्येक व्यक्तीला त्याच्या कार्यक्षेत्रा पुरताच व जबाबदारीनिहाय संगणक प्रणालीला नियंत्रित प्रवेश (Role based limited access) देणे अपेक्षित आहे. तसेच काही कर्मचाऱ्यांना विशिष्ट क्षेत्राचे (उदा. नक्कल वितरीत करणे) कार्यक्षेत्र असल्याने तेवढयाकामापुरताच संगणक प्रणालीमध्ये प्रवेश देणे आवश्यक आहे व यासाठी त्याच्या कार्यक्षेत्राचा अथवा त्याच्या संगणकाचा अन्य व्यक्ती वापर करु शकणार नाही.

**II) बायोमेट्रीकचा वापर:-** संगणक प्रणालीत बायोमेट्रीकचा वापर नसल्यास अन्य व्यक्तीचा युझर नेम व पासवर्ड वापरेन अन्य व्यक्ती संगणकीय डेटामध्ये बदल करु शकतात. म्हणून त्यावर नियंत्रण राहण्यासाठी बायोमेट्रीकचा वापर करणे आवश्यक आहे व त्यामुळे आवश्यक तेवढया कार्यक्षेत्रा पुरताच संगणकात प्रवेश मिळेल व नेमक्या बाबीबाबत जबाबदारी व कर्तव्य निश्चित होईल.

**III) डिजीटल स्वाक्षरीचा वापर:-** संगणकातील माहितीला कायदेशीर व अधिकृत स्वरुप येणेसाठी तसेच डेटा इनक्रिप्ट (Data encrypt) होण्यासाठी डीजीटल स्वाक्षरी (Digital signature) चा वापर करणे आवश्यक आहे. डिजीटल स्वाक्षरी केलेल्या डेटामध्ये अनधिकृतरित्या बदल केल्यास अथवा असा प्रसत्न केल्यास डिजीटल स्वाक्षरी निघून जातील, त्यामुळे डिजीटल स्वाक्षरी चा वापर केल्यास डेटाचे अधिकृत व कायदेशीर स्वरुप टिकून राहते.

**IV) विशिष्ट प्रयोजनासाठीच एडिट मॉडयूल (Edit Module) चा वापर** :- मूळ माहितीची खात्री होईपर्यंत एडिट मॉडयूल (edit module) संगणकीय प्रणालीमध्ये उपलब्ध असेल व नंतर ते बंद करण्यात यावे व त्यानंतर फेरफार मॉडयूल (Mutation Module) चा वापर करणे आवश्यक आहे.

**V) डाटा मध्यवर्ती संगणकात (Central Server) सुरक्षित ठेवणे आवश्यक :-** सध्याच्या पध्दतीत क्लाएंट व सर्व्हर हे स्थानिक स्तरावर आहेत. डाटा स्थानिक स्तरावर उपलब्ध असल्यामुळे त्यात स्थानिक स्तरावर बदल करता येवू शकतात. मात्र संगणक प्रणालीच्याव्दारे मध्यवर्ती संगणकात (Central Server) डाटा ठेवल्यास ते अधिक सुरक्षित राहतील व अधिकृत व्यक्तीशिवाय इतरांना त्यात सहजासहजी हस्तक्षेप करता येणार नाही.

**VI) तपासणी सुत्र (Audit Trail) चा वापर :-** संगणकात कोणतीही कार्यप्रणाली वापरताना जर त्यात तपासणी सूत्र (Audit Trail) असेल तर विशिष्ट बाबी संगणकात कोणी व कधी भरलेल्या आहेत त्यात कधी बदल केलेला आहे या बाबी पाहणे शक्य होते. त्यामुळे भविष्यात गैरप्रकार करण्यास कोणीही धजावणार नाही. म्हणून संगणक प्रणालीत तपासणी सूत्र (Audit Trail) ठेवणे आवश्यक आहे.

VII) **पारदर्शकतेसाठी संकेतस्थळावर मिळकत पत्रिका उपलब्ध करुन देणे:-** भूमि अभिलेख विभागातील तालुका निहाय मिळकतपत्रिका विभागाच्या वेबसाईटवर जनतेला पहाण्यासाठी उपलब्ध करुन दिल्यास त्यात झालेले बदल / चुका नागरिकांच्या पटकन लक्षात येतील व त्याबाबत योग्य त्या ठिकाणी तक्रारी दाखल करु शकतील व जनताच एकप्रकारे धोकादर्शक इशारा देवू शकेल तसेच मिळकत पत्रिकेच्या माहितीमध्येही पारदर्शकता येईल.

VIII) **प्रतिबंधित यादी:-** शासनाचे हितसंबंध असलेल्या अथवा सार्वजनिक मालकीच्या मिळकतीच्या खरेदी विक्रीवर निर्बंध रहावे याकरीता अशा मिळकत पत्रिकांची यादी ही नोंदणी विभागाच्या आय-सरीता (iSARITA) संगणक प्रणालीत प्रतिबंधीत यादी मध्ये सामावून घेणे आवश्यक आहे. भविष्यामध्ये नियोजनाप्रमाणे ७/१२ सारखा मिळकत पत्रिकेचा डाटा ई-पीसीआयएस प्रणालीतून घेवून आय-सरीता (iSARITA) प्रणालीवर दस्त नोंदणी होणार आहे व तसे करताना मिळकत पत्रिकेबाबत प्रतिबंधित सत्ता प्रकाराची माहीती आय-सरीता (iSARITA) संगणक प्रणालीला ऑनलाईन पाठविणे अपेक्षित आहे.

IX) **ऐतिहासिक माहिती जतन करुन ठेवणे :-** संगणक प्रणालीत रितसर रित्या भरण्यात आलेली माहिती पुढे अद्ययावत करण्याचे झालेस अथवा त्यात सुधारणा करण्याच्या झाल्यास मूळ माहिती हि संगणकातून वगळली न जाता ऐतिहासिक माहिती (Historical Data) म्हणून जतन झाली पाहिजे.

X) **व्दिस्तरीय नियंत्रण पध्दती लागू करणे:-** संगणक प्रणालीत कुठलाही डेटा समाविष्ट करणेसाठी किंवा वगळणेसाठी कारणासह नमुद करणेची तरतुद आज्ञावलीत करणेत यावी. तसेच व्दिस्तरीय (Maker and Checker) पध्दतीने त्यास मान्यता देणे आवश्यक राहील. आज्ञावलीतुन कुठलाही डाटा डिलीट करता येणार नाही. संगणकात समाविष्ट करणेत आलेले बदल त्यांच्या कारणासह तसेच सक्षम अधिकारी व बदल व तपासणी करणारे अधिकारी यांची माहिती वेळ व दिनांकासहीत माहिती व्यवस्थापन प्रणाली (MIS) व्दारे उपलब्ध राहतील.

XI) **महत्त्वाच्या कार्यालयात सीसीटीव्ही स्थापित करणे:-** भूमि अभिलेख विभागातील जी कार्यालये महत्त्वाच्या शहरात अथवा ज्या ठिकाणी स्थावर मालमत्ता बहुमूल्य आहेत अशा सर्व ठिकाणी वित्तीय निधी उपलब्धतेच्या अधिन राहून सीसीटीव्ही स्थापित करणे योग्य आहे.

२. बनावट संगणकीकृत मिळकत पत्रिका तयार होऊ नये यासाठी प्रतिबंधक उपाययोजना करण्याकरिता शासनाने स्विकारलेल्या उक्त उपाययोजनांची अंमलबजावणी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयामार्फत करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१११४२५४४३३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh
Haridasrao
Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.06.11 15:59:07 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
**सह सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
३. मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई ४०००३२
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवान, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सविच, विधान भवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. उपसभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
१०. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई
१६. निवड नस्ती